**राज्य क्षेत्रातील योजना**

अंतरावली पाणी पुरवठा योजना, ता. नेवासा
जि. अहमदनगर या योजनेच्या अंदाजपत्रकास व
आराखडयास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,
शासन निर्णय क्र, ग्रापापु-२००८/प्र.क्र.१०४/पापु-०९
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांकः- २६ नोव्हेंबर २०१०.

संदर्भः- १. शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,
क्र.ववेका.१०९८/सीआर/४३७/अ/पापु-१०,दि.२.४.१९९८
२. शासन पत्र क्र. बैठक २००७/ प्र.क्र.३२३/पा.पु.०६ दि. ७/२/२००८

**प्रस्तावनाः-**

अंतरावली पाणी पुरवठा योजना, ता. नेवासा जि. अहमदनगर या पाणी पुरवठा योजनेच्या रु. ७१.४७ लाख ढोबळ खर्चाच्या अंदाजपत्रकास संदर्भीय शासन निर्णय क्र. १ अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली होती. तथापि, काही अपरिहार्य कारणांमुळे योजनेच्या खर्चात रु. १४३.१९ लाखाने वाढ झाली. सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यासाठी स्थापन करण्यात आलेल्या राज्य स्तरावरील छोटया गटाच्या दि.२० डिसेंबर २००७ रोजीच्या बैठकीत शिफारस केल्यानुसार अंतरावली पाणी पुरवठा योजना, ता. नेवासा जि.अहमदनगर या पाणी पुरवठा योजनेस सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णयः-**

वरील बाब विचारात घेऊन अंतरावली पाणी पुरवठा योजनेच्या रु.१४३.१९ लाख (रुपये एक कोटी त्रेचाळीस लाख एकोणीस हजार फक्त) या वाढीव खर्चासह सोबतच्या प्रपत्रात दर्शविल्यानुसार रु. २१४.६६ लाख (रुपये दोन कोटी चौदा लाख सहासष्ट हजार फक्त) इतक्या सुधारित किमतीस प्रशासकीय मंजुरी प्रदान करण्यात येत आहे.

१. ही योजना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामार्फत कार्यान्वित करण्यात येईल.

२. या योजनेच्या मूळ प्रशासकीय मंजुरी दिलेल्या निर्णयात ज्या सूचना दिलेल्या आहेत, त्याचे काटेकोरपणे पालन करावे. तसेच मूळ शासन निर्णयात ज्या अटी व शर्ती दिल्या आहेत त्या कायम राहणार असून त्याचेही पालन करण्यांत यावे.

३ सदर योजना पूर्ण झाल्यावर ती संबंधीत ग्रामपंचायतीच्या ताब्यात देण्यात यावी. संबंधीत कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा बांधकाम विभाग, जिल्हा परिषद, यांच्याकडून योजना प्रत्यक्षात पूर्ण झाली आहे, या आशयाची सूचना मिळाल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत योजना ताब्यात घेण्यासंबंधी संबंधीत ग्रामपंचायत / जिल्हापरिषद जबाबदार राहील. योजना

प्रत्यक्षात पूर्ण झाल्यावर लगेच संबंधित कार्यकारी अभियंता, जिल्हापरिषद संबधित ग्रामपंचायतीच्या अधिका-यांनी संयुक्तपणे पहाणी आयोजित करावी आणि अशा पहाणीत कोणतेही दोष आढळून आल्यास योजना ताब्यात देण्यापूर्वी ते सुधारण्यात यावेत.

४. सदर योजना राबविणे, त्याचे परिरक्षण, दुरुस्त्या (विशेष दुरुस्त्या धरुन) यावर दरवर्षी येणारा आवर्ती खर्च भागविण्यासाठी किंवा घसारा किंवा यंत्रसामुग्री नवी करण्याच्या निधीसाठी किंवा योजनांच्या खर्चातील लाभ घेण्याचा हिस्सा सोसण्यासाठी येईल त्या खर्चाच्या व्यवस्थेसाठी जिल्हा परिषदेस किंवा ग्रामपंचायतीस शासनाकडून कोणतीही मदत मिळणार नाही. महाराष्ट्र ग्रामपंचायत कर व फी नियम, १९६० मधील तरतदींनुसार आकारण्यात येणा-या पाणीपट्टीच्या आधारे योजना स्वावलंबी ठरेल हे पाहण्याची जबाबदारी संबंधित ग्रामपंचायतीची / जिल्हा परिषदेची राहील. त्या अनुषंगाने या योजनेकरीता पाणीपट्टी ग्रामपंचायत आकारेल. ग्रामपंचायतीने तशा आशयाचा ठराव केल्याशिवाय योजनेची उर्वरीत कामे हाती घेवू नयेत.

५. सदर योजनेची उर्वरीत कामे एक वर्षात पूर्ण करण्यात येऊन योजना ग्रामपंचायतीकडे हस्तांतरीत करण्यात यावी.

६. या योजनेवर होणारा मुळ किंमतीपर्यंतचा म्हणजेच रु. ७१.४७ लक्ष मधील रु. ५६.३६ लक्ष इतका खर्च केंद्र शासनाच्या वर्धीत वेग कार्यक्रमांतर्गत मंजूर करण्यात आलेल्या अनुदानामधून भागविण्यात यावा. उर्वरीत रु.१५.११ लक्ष हा खर्च किमान गरजा कार्यक्रमांतर्गत मंजूर करण्यात आलेल्या अनुदानामधून भागवावा. सुधारित किंमतीमधील वाढीव खर्च रु. १४३.१९ लक्ष महाजल खाली उपलब्ध होणाऱ्या निधीमधून राज्य/जिल्हा नियोजन मंडळ यांचे कडून उपलब्ध करुन घ्यावा.

७. हा शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभागाच्या अनुक्रमे अनौपचारिक संदर्भ क्र. ३३२/१४७३ दि. १३/११/२०१० व ५३३/१०/व्यय-३ दि.१६/११/२०१० अन्वये प्राप्त त्या विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक २०१०११२६१८३०५८००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

सोबत-प्रपत्र.

**(ज.र. गणेकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**
विभागीय आयुक्त, नाशिक.
जिल्हाधिकारी, अहमदनगर
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर

सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नाशिक.
वित्तीय सल्लागार व मुख्या लेखाधिकारी, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नवी मुंबई.
महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १/ मुंबई .
अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण (संकल्पचित्र व नियोजन विभाग,)सिडको भवन, नवी मुंबई.
अधिक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण मंडळ, अहमदनगर
कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण बांधकाम विभाग, अहमदनगर
कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, अहमदनगर
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
निवासी लेखा व परिक्षा अधिकारी, मुंबई.
सर्व विधानमंडळ सदस्य,
वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, यांचे स्वीय सहाय्यक पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,
कार्यासन क्रमांक पापु-०४,०६,१०,१३,१७,१९, २० व संगणक कक्ष, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय,
निवडनस्ती कार्यासन पापु-०९.

**सहपत्र**

**शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग क्र. ग्रापापु- २००८/प्र.क्र.१०४/ पापु-०९ दिनांकः- नोव्हेंबर २०१० सोबतचे प्रपत्र.**

**(रुपये लाखात)**

| **योजनेचे नांव** | **तालुका / जिल्हा** | **योजनेची मुळ मंजूर किंमत** | **योजनेचा मुळ मंजूरी आदेश क्र व दिनांक** | **योजनेची सुधारित मंजूर किंमत** | **महाजल योजनेअंतर्गत (राज्य/जिल्हा नियोजन मंडळ यांचे कडून) उपलब्ध** | **वाढीव किंमत** |
|---|---|---|---|---|---|---|

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | **तरतूद** | |
| अंतरावली पाणी पुरवठा योजना | नेवासा/ अहमद नगर | अ) वर्धित वेग कार्यक्रम ५६.३६<br><br>ब) किमान गरजा कार्यक्रम १५.११ | शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. ववेका१०९८ /सीआर/४३ ७/अ/ पापु१०, दि.२.४.१९९ ८ | अ)वर्धित वेग कार्यक्रम ५६.३६<br><br>ब)किमान गरजा कार्यक्रम १५८.३० | **१४३.१९** | **१४३.१९** |
| **एकुण** | | **७१.४७** | | **२१४.६६** | | |

(ज.र.गणेकर)
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन